उप प्रादेशिक परिवहन अधिकारी पदावर
पदोन्नती देणेबाबत.
(निवडसुची २०२०-२१)

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमव्हिडी ०९२०/प्र.क्र.१७६/परि-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २२ ऑक्टोबर, २०२१.

**शासन निर्णय :-**

विभागीय पदोन्नती समितीने शिफारस केल्यानुसार, मोटार वाहन विभागातील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना उप प्रादेशिक परिवहन अधिकारी या पदावर सेवाज्येष्ठतेने तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांचे नाव | प्रशासकीय विभागाने वाटप केलेला महसूली विभाग | वाटप केलेल्या महसूली विभागांतर्गत पदस्थापना द्यावयाचे उप/ प्रादेशिक परिवहन कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | श्री. आर. जे. सरक | नागपुर | नागपूर ग्रामीण |
| २. | श्री. महेश डी. देवकाते | कोकण-२ | पेण |
| ३. | श्रीमती पल्लवी कोठावदे | कोकण-२ | मुंबई (पश्चिम) |
| ४. | श्री. राजवर्धन म. करपे | नागपुर | गोंदीया |
| ५. | श्री. प्रसाद गाजरे | अमरावती | बुलढाणा |
| ६. | श्रीमती अश्विनी स्वामी | औरंगाबाद | परभणी |

२. सदरची तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहेत:-

(अ) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत साप्रवि/१६-ब कार्यासनाच्या दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि.७.५.२०२१ च्या शासन निर्णया प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

(ब) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका स्टॅम्प ६८१९/२०२१ व इतर याचिकांवर मा. उच्च न्यायालयाने दि.२९.६.२०२१, दि.८.७.२०२१ व दि.२२.७.२०२१ रोजी दिलेल्या आदेशांच्या अधीन सदर निवडसुचीस मान्यता दर्शविण्यात येत आहे.

(क) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसुचीतील अधिकाऱ्यांना नियमीतपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

(ड) पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-२०१५/प्र. क्र. ३०३/कार्या-१२, दि.१२.९.२०१६ मधील तरतुदींनुसार कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर पदोन्नतीनंतरची पदस्थापना सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना दि. १४.७.२०२१ मधील तरतुदीनुसार करण्यात आली आहे.

४. संबंधित नियंत्रक अधिका-यांनी वरील अधिकाऱ्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच पदोन्नती मिळालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार कार्यालय प्रमुखांचे सल्ल्याने अन्य अधिकाऱ्याकडे सोपवून, तात्काळ कार्यमुक्त व्हावे व पदोन्नतीच्या ठिकाणी तात्काळ कार्यभार स्विकारावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२२११३०१७०४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, pseudonym=8D691A3CD19CB6007E6D3E2D34F900540C2F2E00, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2021.10.22 16:28:56 +05'30'

**( दिपक पोकळे )**

अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षण), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. मा. मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. संबंधित अधिकारी (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७. संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी
८. निवडनस्ती/परि-४.